**महाराष्ट्र लोकसेवा हक्क अध्यादेश २०१५ मधील तरतूदीनुसार लोकसेवा, पदनिर्देशित अधिकारी, प्रथम व द्वितीय अपिलीय अधिकारी व नियत कालमर्यादा अधिसूचित करण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः मलोह-२०१५/४४७/प्र.क्र.१७३/म-१**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : १४ जुलै, २०१५

वाचा:-

महाराष्ट्र लोकसेवा हक्क अध्यादेश-२०१५ (सन २०१५ चा महाराष्ट्र अध्यादेश क्र.५)

**प्रस्तावना :-**

सार्वजनिक जीवनातील आर्थिक व सामाजिक क्षेत्रांच्या शाश्वत विकासासाठी सुप्रशासन अत्यावश्यक आहे. प्रशासनातील पारदर्शकता, उत्तरदायित्व व प्रतिक्रियाशीलता हे सुप्रशासनाचे तीन अत्यावश्यक घटक आहेत. महाराष्ट्र शासनाने जनता व प्रशासन यामधील संबंध सुधारण्यासाठी व ते बळकट करण्यासाठी, प्रशासनामध्ये उत्तरदायित्व, जबाबदारी व पारदर्शकता आणण्यासाठी, कार्यक्षम व समायोचित, लोकसेवा देण्याकरिता, महाराष्ट्र लोकसेवा हक्क अध्यादेश-२०१५, प्रख्यापित केला असून तो दिनांक २८/०४/२०१५ पासून लागू करण्यात आला आहे.

या अध्यादेशातील कलम ३ मध्ये नमूद करण्यात आल्यानुसार प्रत्येक सार्वजनिक प्राधिकरणाने अध्यादेश लागू झाल्यानंतर ३ महिन्याच्या कालावधीच्या आत आणि त्यानंतर वेळोवेळी पुरवीत असलेल्या लोकसेवा, पदनिर्देशित अधिकारी, प्रथम व द्वितीय अपिलीय अधिकारी आणि नियत कालमर्यादा या अधिसूचित करणे आवश्यक आहे. सदरहू अध्यादेश निर्गमित करण्यामागे सार्वजनिक प्राधिकरणाने त्यांच्याकडून पुरविण्यात येणाऱ्या सेवा या अधिनियमांतर्गत अधिसूचित करुन त्याप्रमाणे संबंधित सेवा पुरविणे आवश्यक आहे.

२. या विभागाच्या अधिपत्याखाली नोंदणी व मुद्रांक विभागाच्या कार्यालयांकडून वेगवगळया सेवा नागरिकांना देण्यात येतात. त्यामधील ज्या सेवा महत्वाच्या आहेत अशा सेवा अध्यादेशाच्या कलम ३ नुसार नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक, महाराष्ट्र राज्य यांच्यामार्फत अधिसूचित करण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. त्या अनुषंगाने शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय:-**

१) नोंदणी व मुद्रांक विभागातील कार्यालयांकडून पुरविण्यात येणा-या सोबतच्या विवरणपत्र “अ” मध्ये दर्शविण्यात आलेल्या १४ सेवा, पदनिर्देशित अधिकारी व द्वितीय अपिलीय अधिकारी व नियत कालमर्यादा नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी महाराष्ट्र लोकसेवा हक्क अध्यादेश-२०१५ मधील कलम ३ नुसार अधिसूचित कराव्यात.

२) या अधिनियमांतर्गत विवरण पत्र "अ" मध्ये नमूद करण्यात आलेल्या सेवा पुरविण्या करिता आकारावयाची फी, विहित नमुना व आवश्यक असलेली कागदपत्रे इत्यादी बाबी नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक, महाराष्ट्र राज्य यांनी निश्चित कराव्यात.

३) पुरविण्यात येणा-या लोकसेवांची सूची नियत कालमर्यादा विहित नमुना, फी, पदनिर्देशित अधिकारी, प्रथम व द्वितीय अपिलीय अधिकारी याचा तपशिल कार्यालयाच्या सूचना फलकावर तसेच त्याच्या संकेतस्थळावर किंवा पोर्टलवर प्रदर्शित करावा.

४) अध्यादेशामधील तरतुदी नुसार सर्व नोंदणी व मुद्रांक विभागाची संरचना व पुरविण्यात येणाऱ्या सेवा विचारात घेऊन अधिनियमातील पदनिर्देशित अधिकारी, द्वितीय अपिलीय अधिकारी यांची नियुक्ती करावी.

५) विवरणपत्र "अ" नुसार सेवा अधिसूचित करण्याबाबतची व त्याची अंमलबजावणी करण्याबाबतची कार्यवाही नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक, महाराष्ट्र राज्य यांनी करावी.

२. उपरोक्त आदेशाची अंमलबजावणी दिनांक २७ जुलै, २०१५ या पूर्वी सुरु करण्याची जबाबदारी नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक यांची राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०७१४१६१७४८१४१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Shyamsundar Liladhar Patil

Digitally signed by Shyamsundar Liladhar Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Shyamsundar Liladhar Patil
Date: 2015.07.14 16:25:46 +05'30'

**( श्यामसुंदर पाटील )**
उप सचिव

**प्रत,**

१. नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक, महाराष्ट्र राज्य, पुणे
२. सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
३. मुख्य सचिवांचे कार्यालय, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
४. निवड नस्ती, कार्यासन म-१, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.

प्रपत्र - अ

| अ. क्र. | लोकसेवेचा तपशील | लोकसेवा पुरविण्यासाठी विहित केलेली कालमर्यादा | पदनिर्देशित अधिका-यांचे पदनाम | प्रथम अपिल अधिका-याचे पदनाम | द्वितीय अपिल अधिका-याचे पदनाम/ कार्यालयीन पत्ता/दूरध्वनी क्र./ ई-मेल |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ५ | ६ | ७ |
| १ | दस्त नोंदणी करणे | १ दिवस | संबधित दुय्यम निबंधक | नोंदणी अधिनियम,१९०८ चे कलम ७२ अन्वये जिल्हा निबंधक तथा जिल्हाधिकारी यांचेकडे [ संबंधित जिल्हयाचे सह जिल्हा निबंधक यांचेमार्फत ] दुय्यम निबंधक यांच्या आदेशापासून ३० दिवसाचे आत | या प्रकरणी लागू नाही |
| २ | दस्ताच्या सूचीची प्रमाणित नक्कल देणे | ३ दिवस | संबधित दुय्यम निबंधक | नोंदणी कायद्यात अपीलाची तरतूद नाही तथापि तक्रार दाखल करता येईल. | या प्रकरणी लागू नाही |
| ३ | दस्ताची प्रमाणित नक्कल देणे | ५ दिवस | संबधित दुय्यम निबंधक | संबंधित जिल्हयाचे सह जिल्हा निबंधक | या प्रकरणी लागू नाही |
| ४ | शोध उपलब्ध करणे | १ दिवस | संबधित दुय्यम निबंधक | संबंधित जिल्हयाचे सह जिल्हा निबंधक | या प्रकरणी लागू नाही |
| ५ | नोटीस ऑफ इंटिमेशन फाईल करुन घेणे. | १ दिवस | संबधित दुय्यम निबंधक | संबंधित जिल्हयाचे सह जिल्हा निबंधक | या प्रकरणी लागू नाही |
| ६ | मुद्रांक शुल्क भरण्याचे प्रयोजनार्थ मूल्यांकन अहवाल देणे | ३ दिवस | संबधित दुय्यम निबंधक | संबंधित जिल्हयाचे सह जिल्हा निबंधक | या प्रकरणी लागू नाही |
| ७ | दस्त नोंदणी संदर्भात गृहभेट देणे | ३ दिवस | संबधित दुय्यम निबंधक | संबंधित जिल्हयाचे सह जिल्हा निबंधक | या प्रकरणी लागू नाही |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| ८ | विशेष कुलमुखत्यारपत्राचे अधिप्रमाणन करुन देणे. | १ दिवस | संबधित दुय्यम निबंधक | संबंधित जिल्हयाचे सह जिल्हा निबंधक | या प्रकरणी लागू नाही |
| ९ | सह जिल्हा निबंधक कार्यालयात नोंदणी झालेल्या दस्ताची/ त्या दस्ताच्या सूचीची प्रमाणित नक्कल देणे | १५ दिवस | संबधित सह जिल्हा निबंधक | संबंधित प्रादेशिक विभागाचे नोंदणी उपमहानिरीक्षक व मुद्रांक उपनियंत्रक | या प्रकरणी लागू नाही |
| १० | दस्त नोंदणी न केलेल्या प्रकरणांमध्ये, ई-पेमेंट पध्दतीने भरलेल्या नोंदणी फीचा परतावा | २२ दिवस | संबधित सह जिल्हा निबंधक | संबंधित प्रादेशिक विभागाचे नोंदणी उपमहानिरीक्षक व मुद्रांक उपनियंत्रक | या प्रकरणी लागू नाही |
| ११ | मृत्युपत्राचा सीलबंद लखोटा जमा करणे, परत घेणे व उघडणे | १ दिवस | ***** | संबंधित प्रादेशिक विभागाचे नोंदणी उपमहानिरीक्षक व मुद्रांक उपनियंत्रक | या प्रकरणी लागू नाही |
| १२ | विशेष विवाह कायदा, १९५४ अन्वये विवाह संपन्न करणे | नोटीस प्रसिध्द झाल्यापासून ९० दिवसाच्या आत | संबंधित विवाह अधिकारी | संबंधित जिल्हयाचे सह जिल्हा निबंधक | विशेष विवाह कायदा, १९५४ चे कलम ८ नूसार सक्षम न्यायालयाकडे विवाह अधिका-याच्या आदेशाच्या दिनांका पासून ३० दिवसांचे आत |
| १३ | विवाह प्रमाणपत्राच्या प्रमाणित नकला देणे | १५ दिवस | संबंधित विवाह अधिकारी | संबंधित जिल्हयाचे सह जिल्हा निबंधक | या प्रकरणी लागू नाही |
| १४ | इतर पध्द्तीने अगोदरच झालेल्या विवाहाची विशेष विवाह कायदा, १९५४ अंतर्गत नोंदणी करणे | ३० दिवसांचा कालावधी संपल्यानंतर पूर्वनियोजीत वेळेनुसार १ तास | संबंधित विवाह अधिकारी | संबंधित जिल्हयाचे सह जिल्हा निबंधक | विशेष विवाह कायदा, १९५४ चे कलम १७ नूसार सक्षम न्यायालयाकडे विवाह अधिका-याच्या आदेशाच्या दिनांका पासून ३० दिवसांचे आत |